**<u>महिला व बाल विकास विभागांतर्गत सुरू असलेल्या स्वयंसेवी संस्थांची बालगृह तपासणीबाबत.</u>**

# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांकः बालगृ-२०१५/प्र.क्र.५०/का-८,

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
तारीख: १३ जुलै, २०१५.

<u>वाचा :-</u>

१) आयुक्त,महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे यांचे पत्र क्र.मबाविआपु/बावि/अबकड/२०१५-१६/का.५/५८५२ दि.२५.०५.२०१५
२) शासनपत्र क्र.बालगृ-२०१५/प्र.क्र.५०/का-८ दि.१७ जून,२०१५
३) आयुक्त,महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे यांचे पत्र क्र.मबाविआ/बावि/आप्रप/प्र.६/१५-१६/३३८९ दि.२० जून,२०१५

<u>प्रस्तावना :-</u>

महाराष्ट्र बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) नियम **२००२,** अंतर्गत असलेल्या तरतूदीनुसार शासनस्तरावरून स्वयंसेवी संस्थांच्या बालगृहांना वेळोवेळी मान्यता प्रदान केलेली आहे. बालगृहाबाबत सदरची बालगृहे विहीत केलेल्या निकषानुसार सुरू आहेत किंवा कसे याबाबत पडताळणी करण्याची बाब शासनस्तरावर विचाराधिन होती.

## शासन निर्णय:-

याबाबत यापूर्वी निगर्मित केलेले वाचा मधील अनु.क्र.**२** येथील दि.**१७** जून**,२०१५** चे पत्र याआदेशान्वये अधिक्रमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्र बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) नियम २००२, अंतर्गत असलेल्या तरतूदीनुसार स्वयंसेवी संस्थांच्या बालगृहांना वेळोवेळी मान्यता प्रदान केलेली आहे. सदरची बालगृहे विहीत केलेल्या निकषानुसार सुरू आहेत किंवा कसे याबाबत महाराष्ट्र बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) नियम २००२, अंतर्गत नियम ८२ व ८३ मधील तरतूदीनुसार बालगृहांची तपासणीचे अधिकार राज्य शासनास आहेत. त्याअनुषंगाने संपूर्ण महाराष्ट्रातील स्वयंसेवी संस्थांमार्फत सुरू असलेली बालगृहे कालबध्द कार्यक्रम आखून तपासणी करण्याचा निर्णय शासनस्तरावर घेण्यात येत आहे. तपासणी करताना आवश्यक असलेले पथक खालीलप्रमाणे निर्माण करण्यात येत आहे व सोबत जोडल्याप्रमाणे तपासणी सूची निर्धारित करण्यात आली आहे.त्यासह याबाबत खालीलप्रमाणे सुचना देण्यात येत आहेत.

१) उपजिल्हाधिकारी / उपमुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद / तहसिलदार / सेवाभावी संस्थेचा प्रतिनिधी यांचे पथक तयार करून पथकाने जिल्ह्याबाहेरील बालगृह तपासावे.
२) विभागीय आयुक्त यांनी तपासणी कार्यक्रम एकाच दिवशी करावा.

३) संबंधित तपासणी पथकाला प्रशिक्षण द्यावे यासाठी वित्तीय अधिकार नियमाच्या अधिन राहून उपलब्ध निधीतून खर्च करावा.

४) विभागीय आयुक्त / जिल्हाधिकारी यांनी संबंधित पथकाला वाहन उपलब्ध करून द्यावे.

५) बालकांची नोंद सामाजिक न्याय / आदिवासी शाळा / वसतिगृहात आहे किंवा कसे याची शहानिशा करण्यात यावी.

६) पथकामध्ये सामाजिक न्याय, आदिवासी विभाग, शिक्षण विभाग अधिकाऱ्यांचा समावेश फक्त माहिती उपलब्ध करण्यासाठी असावा.

७) एका पथकाला २० बालगृहे तपासणीसाठी द्यावेत (जास्तीत जास्त तीन दिवसात).

८) आयुक्त,महिला व बाल विकास विभाग यांनी राज्यस्तरावरून संनियंत्रण करावे.

९) तपासणी संदर्भात बालगृहांना तपासणीच्या संभाव्य तारखा जाहीर कराव्यात.

१०) तपासणी सूची बालगृहांना तपासणी पूर्व कळवावी.

११) शासन निर्णय क्र.संकीर्ण-२००५/प्र.क्र.२१०/का-३, दि.०९ ऑगस्ट,२००६ अन्वये निर्धारित केलेल्या प्रवेशितांचे आहार प्रमाण खाजगी स्वयंसेवी संस्थांसाठी देखील ग्राह्य धरण्यात यावे.

१२) विवरणपत्र "अ" नुसार श्रेणी निश्चित करण्यात आली आहे. तसेच, विवरणपत्र "ब" नुसार तपासणी सूची निश्चित करण्यात आलेली आहे (विवरणपत्र "अ" व "ब" शासननिर्णयासोबत जोडले आहे).

उपरोक्त तपासणी विहीत केलेल्या कालमर्यादेत करून याबाबतचा अहवाल तात्काळ शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१५१६५८०२७४३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pramod Bhimsen Shingre

Digitally signed by Pramod Bhimsen Shingre
DN: CN = Pramod Bhimsen Shingre, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Reason: I am the author of this document
Date: 2015.07.23 12:20:59 +05'30'

**(प्र.भि.शिंगरे)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. मा.मंत्री, महिला व बाल विकास विभाग,महाराष्ट्र राज्य.
२. मा.राज्यमंत्री, महिला व बाल विकास विभाग,महाराष्ट्र राज्य.
३. अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
४. प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
५. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
६. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
७. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई-३२

८. प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२

९. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे

१०.आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना,रायगड भवन,नवी मुंबई.

११.सर्व विभागीय आयुक्त,महाराष्ट्र राज्य.

१२.निवड नस्ती (कार्यासन-८).

# विवरणपत्र -अ॰

| अ.क्र. | गुणांची टक्केवारी | श्रेणी |
|---|---|---|
| १. | ९०% पेक्षा जास्त-(९०%अंतर्भूत) | अ |
| २. | ८०-८९ % | ब |
| ३. | ७०-७९ % | क |

**महाराष्ट्र शासन, महिला व बाल विकास विभाग**

**बालकांच्या निवासी संस्थेचे गुणात्मक वर्गीकरणाबाबत गुणात्मक विवरणपत्र -ब**

**संस्थेचे नाव व संपुर्ण पत्ता :-**

**बालगृहाचे नाव व संपुर्ण पत्ता :-**

**बालगृह मान्यता आदेश क्र. व दिनांक :-**
**जे. जे. ॲक्ट ३४(३) नुसार नोंदणीपत्र क्र. व दिनांक :-**
**बालगृह प्रवेशितांची मंजूर संख्या :-**
**संस्था चालकाचे संपुर्ण नांव, पता, फोन क्र. (लँड लाईन व मोबा.क्र.) :-**

| **अ.क्र.** | | **तपासणी मुद्दा** | **तपासणी अधिकाऱ्याचे अभिप्राय** | **गुण-२००** | **तपासणी अंती दिलेले गुण** |
|---|---|---|---|---|---|
| | | **मागील एक वर्षाच्या भेटीची सरासरी उपस्थितपासणीसाठी ग्राह्य धरावी.** | **भेटीची संख्या :** | **सरासरी उपस्थिती:** | |
| **१** | | **बाल कल्याण समितीने दिलेल्या दाखल आदेशाबाबत** | | | |
| | १ | बाल कल्याण समितीने दिलेल्या दाखल आदेशाची एकूण संख्या | | | |
| | २ | बाल कल्याण समितीचे सर्व प्रवेशितांचे विहीत नमून्यात दाखल आदेश असल्यास १० गुण देण्यात यावेत व आदेश विहीत नमुन्यात नसल्यास ५ गुण देण्यात यावेत व बाल कल्याण समितीचे आदेश नसल्यास ० गुण देण्यात यावेत. | | १० | |
| | ३ | ७ दिवसापेक्षा जास्त कालावधीसाठी रजेवर सोडलेल्या प्रवेशिताचा अर्ज, रजेवर सोडताना बाल कल्याण समितीची परवानगी घेतली असल्यास तसेच ७ दिवसापर्यंत रजेवर सोडताना संस्था अधिक्षकांची मंजुरी घेतली असल्यास ५ गुण देण्यात यावेत. यापैकी कोणतीही परवानगी घेतली नसल्यास ० गुण देण्यात यावेत. | | ५ | |
| **२** | | **प्रवेशित उपस्थितीबाबत** | | | |
| | १ | भेटीच्या दिवशी प्रत्यक्ष उपस्थिती | | | |
| | २ | उपस्थित प्रवेशितांची संख्या बाल कल्याण समितीने दिलेल्या दाखल आदेशाच्या टक्केवारीनूसार (९१ ते १००% = १० गुण, ८१ ते ९०% = ९ गुण, ७१ ते ८०% = ८ गुण, ६१ ते ७०% = ७, ५१ ते ६०% = ६ गुण, ४१ ते ५०% = ५ गुण, ३१ ते ४०% = ४ गुण, २१ ते ३०% = ३ गुण, ११ ते २०% = २ गुण व १ ते १०% = १ गुण (रितसर रजेची परवानगी / मंजुरी घेतली असल्यास सदर प्रवेशिताची संख्या उपस्थितीमध्ये फक्त गुण देण्यासाठीच समाविष्ट करावी.) | | १० | |
| **३** | | **संस्थेतील लाभ धारकांचा आहार व अल्पोपहार व्यवस्था कशी आहे** | | | |
| | १ | फळे, दुध, मटण मासे, अंडी, कंदभाजी, पालेभाजी, चपाती, डाळी इ. यांचा भोजनात समावेश असतो काय, असल्यास निकषानूसार दोन्ही वेळेस चौरस व पोटभर भोजन असेल तर ९ ते १२ गुण, पोटभर असेल तर ५ ते ८ गुण, चौरस व पोटभर नसेल तर दर्जानुसार ४ व त्यापेक्षा कमी गुण देण्यात यावेत. (मुलांशी प्रत्यक्ष चर्चा करून व या विषयाशी संबंधित रजिस्टर तपासून खात्री करावी. दोन्ही वेळच्या जेवनामध्ये चपाती/भाकरी/पोळी, भाजी - दोन्ही वेळेस वेगवेगळी, वरण भात हे पदार्थ चवदार व दर्जेदार असावेत. आठवडयातून एकदा मटन/मासे/गोड पदार्थ जेवनामध्ये असावेत. ) | | १२ | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | २ | सकाळी तसेच दुपारचे व रात्रीचे भोजनाच्या मध्यंतरीच्या कालावधीत दोन्ही वेळेस पुरेसा अल्पोपहार देत असल्यास ४ गुण, एकवेळेस अल्पोपहार देत असल्यास २ गुण देण्यात यावे व अल्पोपहार दिला जात नसल्यास ० गुण द्यावेत. | | ४ | |
| | ३ | संस्थेमध्ये मान्य संख्येनुसार पुरेसा किमान ४५ दिवस पुरेल इतका अन्नधान्य साठा व इतर साहित्य उपलब्ध असल्यास ३ गुण व ४५ दिवस पुरेल इतका साठा व इतर साहित्य नसल्यास २ गुण व साठाच नसल्यास ० गुण देण्यात यावे. (प्रत्यक्ष स्टोअरची, त्यातील काही वस्तूंची वजने / संख्या व संबंधित नोंदवहयांची तपासणी करावी.) | | ३ | |
| ४ | | **लाभ धारकांचे बिछाने** | | | |
| | १ | गादी साठी २ गुण, उशीसाठी १ गुण, बेडशिटसाठी १ गुण, सतरंजी-१ गुण ब्लँकेट / चादर यासाठी १ गुण देण्यात यावे. या पैकी जी वस्तु नसेल त्यासाठी ० गुण देण्यात यावें. | | ६ | |
| | २ | बिछाने स्वच्छ असल्यास २ गुण, कमी स्वच्छ असल्यास १ गुण व स्वच्छ नसतील तर ० ते १ गुण देण्यात यावे. | | २ | |
| ५ | | **लाभ धारकांची निवास व्यवस्था व इमारत** | | | |
| | १ | निकषाप्रमाणे व मान्य सं्ाख्येनुसार इमारत/जागा उपलब्ध असल्यास १२ गुण द्यावेत. ( प्रतिलाभार्थी निवास-४० स्के.फु.व इतर-१५ स्के.फु. असे एकूण- ५५ स्वे.फु ) इमारत निकषानुसार कमी असल्यास तपासणी पथकाने तपासणी केल्यानंतर व आवश्यकतेनुसार व इमारतीचा दर्जा पाहून १ ते ६ गुण कमी करण्यात यावेत. | | १२ | |
| | २ | मंजूर प्रवेशित संख्येनुसार शौचालय-७ लाभार्थ्यांसाठी-१ प्रमाणे उपलब्ध असल्यास ४ गुण द्यावेत व या प्रमाणे नसेल तर ० गुण द्यावेत. | | ४ | |
| | ३ | मुजूर प्रवेशित संख्येनुसार स्नानगृहे-१० लाभार्थ्यासाठी १ प्रमाणे उपलब्ध असल्यास ४ गुण द्यावेत व या प्रमाणे नसेल तर ० गुण द्यावेत. | | ४ | |
| | ४ | विद्युतव्यवस्था पुरेशी व बंदिस्त फिटींग (पट्टी / पाईप/ कन्सील्ड इ.) असल्यास २ गुण द्यावेत व वायर्स उघडया असतील तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| | ५ | विद्युत पुरवठा खंडीत झाल्यास संस्थेने पर्यायी व्यवस्था (इन्व्हेटर / सोलर कंदील / लँप / इमरजन्सी लँप इत्यादी ) असल्यास २ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| | ६ | इमारतीची स्थिती - हवेशीरपणा, प्रकाशव्यवस्था व खेळती हवा असल्यास ३ गुण द्यावेत व इमारतीमध्ये हवा खेळती नसल्यास, पुरेशी नैसकर्गक प्रकाश व्यवस्था नसल्यास, अंधाऱ्या खोलीत मुलांची निवास व्यवस्था केली असल्यास तर ० गुण द्यावेत. | | ३ | |
| | ७ | खेळण्यासाठी संस्थेचे क्रिडांगण उपलब्ध असल्यास ४ गुण, पर्यायी किमान ५०० मीटरच्या परिसरात क्रिडांगण असल्यास व त्याचा मुलांना खेळण्यासाठी वापर होत असल्यास २ गुण व मुलांना खेळण्यासाठी क्रिडांगण उपलब्ध नसेल तर ० गुण द्यावेत. | | ४ | |
| | ८ | पिण्याचे पुरेसे, स्वच्छ व निर्जतुक (पाण्याची प्रयोगशाळेकडून तपासणी केली असल्यास / ॲक्वागार्ड / यासारखे फिल्टर बसविले असतील तर ) पाणी उपलब्ध असल्यास ४ गुण द्यावेत, साधे फिल्टर / पाणी गाळून / पारंपारीक पद्धतीनुसार पाण्याचे निर्जंतूकीकरण केले जात असेल तर २ गुण द्यावेत, व या पैकी काहीच क रण्यात येत नसेल तर ० गुण द्यावेत. | | ४ | |
| | ९ | अं्ाघोळीसाठी, कपडे धुण्यासाठी व वापरण्यासाठी पुरेसे (किमान २० लि. प्रती मुल प्रती दिन ) पाणी असल्यास ३ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | ३ | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | १० | संस्था इमारत सुरक्षिततेच्या दृष्टिने बंदिस्त असल्यास ( संरक्षण भिंत,कंपाऊंड इ.) ३ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | ३ | |
| | ११ | आकृतीबंधानुसार प्रवेशितांसाठी पुरेसा कर्मचारी वर्ग असल्यास २ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| ६ | | **संस्था परिसर व इमारत स्वच्छते बाबत** | | | |
| | १ | इमारतीची रंगरंगोटी केलेली असल्यास ३ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | ३ | |
| | २ | इमारत आणि स्नानगृह व शौचालय स्वच्छ असल्यास ३ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | ३ | |
| | ३ | नियमीत फिनाईलचा वापर करत असल्यास २ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| | ४ | इमारत स्वच्छतेसाठी स्वतंत्र सफाईगाराची नेमणूक केली असल्यास २ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| | ५ | सांडपाण्याची/जलनिस्सारण पध्दती व्यवस्थीत असल्यास २ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| ७ | | **प्रवेशितांचे कपडे/प्रसाधन व इतर साहित्य** | | | |
| | १ | प्रवेशितांना संस्थेने शालेय गणवेश (२ नग ) व संस्थेत वापरावयाचे ( २ नग ) दिले असल्यास ५ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | ५ | |
| | २ | प्रवेशितांना आवश्यकतेनुसार अंतरवस्त्रे, टॉवेल देण्यात आलेले असल्यास २ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| | ३ | कपडयांची स्वच्छता नियमीत केली जात असल्यास २ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| | ४ | मुलांना खोबरेल तेल, महिन्यातुन दोनदा अंघोळीचा साबण महिन्यातुन एकदा कपडे धुण्याचा साबण दिला असल्यास २ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| | ५ | आवश्यकतेप्रमाणे दंत मंजन, टुथपेस्ट, ब्रश दिलेला असल्यास २ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| | ६ | मुलींसाठी केसांना लावण्यासाठी दररोज खोबरेल तेल, आठवडयातुन एकदा रिठयाची पावडर किंवा शिकेकाईची पावडर / शांपू, गरजेनुसार अंघोळीचा साबण दिलेला असल्यास १ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. (मुलांची संस्था असेल तर पुर्ण १ गुण देण्यात यावा. ) | | १ | |
| | ७ | वयात आलेल्या मुलींना गरजेनुसार सॅनिटरी नॅपकिन्स पुरविण्यात आलेले असल्यास १ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. (मुलांची संस्था असेल तर पुर्ण १ गुण देण्यात यावा. ) | | १ | |
| | ८ | प्रवेशितांना साहित्य ठेवण्यासाठी पेटी/छोटे कपाट इ.साहित्य उपलब्ध करून दिले असल्यास २ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| ८ | | **प्रवेशितांच्या आरोग्या बाबत** | | | |
| | १ | प्रवेशित दाखल झाल्यावर त्यांची २४ तासाच्या आत वैद्यकिय तपासणी झालेली आहे काय असल्यास २ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| | २ | मानद वैद्यकिय अधिकारी यांची नेमणूक केली आहे काय असल्यास २ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| | ३ | प्रत्येक प्रवेशितांची वैद्यकिय केस शिट स्वतंत्र ठेवलेली आहे काय असल्यास १ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | १ | |
| | ४ | प्रवेशितांची त्रैमासिक वैद्यकिय तपासणी केली जाते काय असल्यास २ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| | ५ | वैद्यकिय नोंदी नियमीत पणे नोंदविल्या जातात काय असल्यास १ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | १ | |
| | ६ | प्रथमोपचार पेटी मधील औषधे पुरेशी व मुदतीतील आहेत काय असल्यास २ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| ९ | | **प्रवेशितांच्या शैक्षणिक व व्यवसायिक प्रशिक्षण सुविधे बाबत** | | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | १ | शैक्षणिक साहित्य पुरविण्यात आलेले आहे काय ? (वह्या, पुस्तके, पेन, पेन्सिल, दप्तर व इतर आवश्यक शैक्षणिक साहित्य ) असल्यास ३ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | ३ | |
| | २ | संस्थेपासून शाळेत प्रवेशितांना जाणे येणे साठी संस्थेने व्यवस्था केली आहे काय ? असल्यास १ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | १ | |
| | ३ | प्रवेशितांना व्यवसाय प्रशिक्षण दिले जाते काय ( संगणक व इतर ) असल्यास ३ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | ३ | |
| | ४ | शाळेव्यतिरीक्त विद्यार्थ्यांना / प्रवेशितांना शिकवणी दिली जाते काय असल्यास २गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| **१०** | | **करमणूक सुविधा व साहित्य** | | | |
| | १ | दुरदर्शन संच आहे काय असल्यास २ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| | २ | वाचनासाठी पुरेशी पुस्तके उपलब्ध आहेत काय असल्यास १ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| | ३ | खेळ साहित्य (Indoor )- कॅरम, बुध्दीबळ इ. खेळ साहित्य ( Outdoor )- क्रिकेट साहित्य, फूटबॉल, लिंगोरचा इ असल्यास ५ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | ३ | |
| | ४ | प्रवेशितांची सहल, वार्षिक स्नेहसंमेलन आयोजित केले जाते काय असल्यास २ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| **११** | | **लाभधारक व कर्मचारी यांच्यातील संबंध (इंटरअॅक्शन)** | | | |
| | १ | कर्मचारी व प्रवेशितांमध्ये सुसंवाद आहे काय असल्यास २ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| | २ | कर्मचारी प्रवेशितांचे संगोपन व संस्काराचे कार्य व्यवस्थित करतात काय असल्यास १ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| | ३ | संस्थेने समुपदेशकाची नेमणूक केलेली आहे काय ? प्रवेशितांचे समुपदेशन केले जाते काय असल्यास २ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| | ४ | संस्थेत तक्रार पेटी ठेवली असल्यास व त्या अनुषंगाने नियमीत कार्यवाही होत असल्यास २ गुण देण्यात यावे नसेल तर ० गुण देण्यात यावे. | | २ | |
| | ५ | स्थानिक व्यवस्थापन समिती स्थापन करून त्यानुसार कार्यवाही होत असल्यास २ गुण व नसल्यास ० गुण देण्यात यावे. | | २ | |
| **१२** | | **संस्थेतील नोंदवह्याबाबत** | | | |
| | १ | प्रवेश नोंदवही, पर्यवेक्षण नोंदवही, वैद्यकिय अभिलेखे / फाईल्स, पोषण आहार नोंदवही, कच्चा माला नोंदवही, आदेश पुस्तक, कॅशबुक, अर्थसंकल्प विवरण फाईल, चौकशी अहवाल फाईल, केस फाईल, आवक जावक नोंदवही, अभ्यागत पुस्तक, वैद्यकिय मालमत्ता नोंदवही, रेशन, हजेरी, डेडस्टॉक, साहित्य वाटप, गेट इ. यासर्व नोंदवह्या अद्ययावत ठेवल्या असल्यास ५ गुण नोंदवहया ठेवलेल्या आहेत परंतू त्या अपूर्ण असल्यास ३ ते ४ गुण देण्यात यावे.सर्वच नोंदवहया अपूर्ण असल्यास १ ते २ गुण, नोंदवहया नसतील तर ० गुण द्यावेत. | | ५ | |
| | २ | प्रवेशितांच्या केस फाईल्स ठेवण्यात आलेल्या आहेत काय व त्यामध्ये अद्ययावत नोंदी घेतलेल्या आहेत काय असल्यास २ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| | ३ | मुलींच्या संस्थेमध्ये मासिक पाळी रजिस्टर अद्ययावत ठेवले असल्यास १ गुण (मुलांची संस्था असेल तर पुर्ण १ गुण देण्यात यावा. ) | | १ | |
| **१३** | | **संस्थेतील प्रवेशितांच्या पुनर्वसनाबाबत** | | | |
| | १ | संस्थेने प्रवेशितांच्या पुनर्वसनाचा केलेला आराखडा व त्यांच्या पूर्ततेसाठी केलेली उपाययोजना केली असल्यास ३ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | ३ | |
| | २ | संस्थेन आतापर्यंत संस्थेतून बाहेर पडलेल्या प्रत्येक प्रवेशिताच्या बाबत केलेल्या पुनर्वसनाबाबतची माहिती अद्ययावत (उदा. नोकरी , व्यवसाय, विवाह इत्यादी )असल्यास २ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | २ | |
| | ३ | संस्थेमधील (१२ वर्षाच्या आतील) अनाथ, बालकांच्या बाबतीत त्याच्या पुढील पुनर्वसनासाठी दत्तक संस्थेमार्फत दत्तक देण्यासाठी संस्थेने प्रयत्न केले असल्यास १ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | १ | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **१४** | | **स्वंयपाकाची भांडी** | | | |
| | १ | संस्थेमध्ये स्वयंपाकाची भाडी पुरेसी व स्वच्छ असल्यास ३ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | ३ | |
| | २ | सर्व प्रवेशितंाना प्लेट, ताट, वाटया,ग्लास, चमचे याचे वाटप केले असल्यास २ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. एका मुलाला किमान एक ताट / प्लेट, एक वाटी, एक ग्लास, एक चमचा या साहित्याचा वाटप केलेला असावा. | | २ | |
| **१५** | | **बायोमॅट्रीक संयत्र, ट्रॅक चाईल्ड, बाल आधार कार्ड बाबत** | | | |
| | १ | संस्थेमध्ये बायोमॅट्रिक यंत्र बसवून कार्यान्वित करण्यात आलेले असल्यास त्यामध्ये प्रत्येक प्रवेशितांची उपस्थिती नोंदली जात असल्यास ५ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | ५ | |
| | २ | संस्थेतील प्रत्येक प्रवेशितांची ऑनलाईल ट्रॅक चाईल्ड सिस्टिम मध्ये माहिती भरली असल्यास ५ गुण द्यावेत व नसेल तर ० गुण द्यावेत. | | ५ | |
| | ३ | संस्थेतील / बालगृहातील सर्व मुलांची / मुलींची आधार कार्ड / नोंदणी १००% असल्यास ५ गुण देण्यात यावेत, ५० तेे ९९ % आधार कार्ड / नोंदणी असल्यास ३ गुण व ५० % पेक्षा कमी आधार कार्ड / नोंदणी झालेली असल्यास ० गुण देण्यात यावेत. | | ५ | |
| **१६** | | संस्थेच्या कामकाजाबाबत तसेच संस्थेच्या वेगवेगळया उपक्रमाविषयी वृत्तपत्रात प्रसिध्द झालेल्या चांगल्या बातमीबाबत २ गुण देण्यात यावेत. कोणतीही बातमी नसेल तर १ गुण व प्रतिकुलबातमी असल्यास ० गुण देण्यात यावे. | | २ | |
| **१७** | | वरील १ ते १६ व्यतिरीक्त संस्थेने प्रवेशितांसाठी अतिरीक्त सोयी सुविधा दिल्या असल्यास २ गुण देण्यात यावेत. (पलंग, छत्री, रेनकोट, स्वेटर इ. ) | | २ | |
| | | **एकुण गुण -** | | **२००** | |

**संस्थेबाबत खालील घडलेल्या घटनांच्या अनुषंगाने उपरोक्त एकुण गुणांपैकी वजा करावयाचे गुण**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १८ | | संस्थेमध्ये व संस्था परिसरात संस्थेचे पदाधिकारी / कर्मचारी इ. यांचेकडून प्रवेशितांवर लैंगिक अत्याचाराच्या घटना घडल्यास ०५ गुण वजा करावेत | | (-) ५ | |
| १९ | | संस्थेमध्ये व संस्था परिसरात प्रवेशितांचा मृत्यू नैसर्गिक कारणांव्यतिरीक्त इतर कोणत्याही कारणाने झाल्यास ०५ गुण वजा करावेत | | (-) ५ | |
| २० | | संस्थेमध्ये व संस्था परिसरात प्रवेशितांकडून साफसफाईचे व इतर शारीरिक कष्टाची कामे करून घेण्यात येत असल्यास ०५ गुण वजा करावेत | | (-) ५ | |
| २१ | | प्रवेशित किंवा प्रवेशितांचे पालक यांचे अर्थिक, मानसिक, शारीरिक व इतर कोणत्याही प्रकारचे शोषण होत असल्यास तसेच प्रवेशितांना संस्थेचे पदाधिकारी / कर्मचारी इ. यांचेकडून मारहाण होत असल्यास ०५ गुण वजा करावेत | | (-) ५ | |
| २२ | | आयुक्तालयाच्या / शासनाच्या परवानगी शिवाय संस्थेच्या बालगृहाची इमारत परस्पर बदलली असेल तर ०५ गुण वजा करावेत. | | (-) ५ | |

**तपासणी पथकप्रमुखाचे नाव, पदनाम व स्वाक्षरी (मो.नं.)**

**पथक सदस्य नाव, पदनाम व स्वाक्षरी (मो.नं.)**